दैत्यराज प्रल्हादाला कथा सांगतांना महामुनी गृत्समद म्हणतात, 'तारकासुरास आव्हान देवून देवराजांनी शरवर्षाव आरंभिला. त्या मंत्रयुक्त बाणांच्या प्रवाहाने दैत्यसैन्य पिडीत होऊ लागले. संत्रस्त झाले. सेनानायक त्या पळणाऱ्या दैत्यसेनेला सावरत देवतांवर उत्तरादाखल प्रहार करू लागले. त्या प्रत्युत्तराने देवसेनाही आहत



जय गजानन ४८

झाली. प्रलयकाळी कोणी त्राता नसावा तशी पळू लागली. मग देवता त्यांना धीर देत आणि दैत्यावर हल्ला करीत. त्यानंतर राक्षस नायक तारकासुराने एक भयावह बाण सोडला. तो प्रज्वलित बाण सुसाट वेगाने गेला आणि थेट श्रीइंद्राच्या हृदयावर आघात करता झाला. त्या भयानक आघाताने देवराज मूर्च्छित झाले. मात्र ताबडतोब शुद्धीवर येऊन त्यांनी हाती वज्र घेतले आणि त्या भयावह आघाताने त्यांनी तारकासुराला धराशायी केले.

वरूण, अग्नी, वायू, यमधर्म इ. देवतांनीही अनेक राक्षस सेनापतींचा नि:पात केला. आसुरी सेनेत हाहाकार माजला.

असंख्यासंख्य सैनिक मृत झाले आणि मग दैत्यगुरू शुक्राचार्यांनी आपल्या मंत्रशक्तीने त्या सगळ्यांना पुनश्च उठवले. तारकासुरादि समस्त दैत्यवीर त्यामुळे पुनश्च लढण्यासाठी सिद्ध झाले.

तारकासुराने उठताक्षणी अग्निमंत्राने भारलेला बाण सोडला. त्यातून प्रलयाग्नी समान आगीच्या ज्वाला प्रगटू लागल्या. देवसैन्य होरपळू लागले. मेरू मंदार पर्वताप्रमाणे भयावह वाटणाऱ्या त्या ज्वालांनी समस्त सुरसेनेला ताब्यात घेतले. देवसेनेत हाहाकार माजला. ते दाही दिशांना पळू लागले आणि जणू त्यांचा पाठलाग करावा तसा तो अग्निपुरूष त्यांच्या मागे धावू लागला.

त्यावेळी संतप्त देवराजांनी त्या अग्निअस्त्राचे शमन करण्यासाठी पर्जन्यास्त्राचा प्रयोग केला. त्या वारूणास्त्राने प्रथम अग्नी शांत केला आणि मग दैत्यसेना बुडविण्यास आरंभ केला. भयानक मेघगर्जना होऊ लागली. त्यातून राक्षसी सेनेवर विद्युल्लतापात होऊ लागले. त्या आघाताने दैत्य सेना क्षणात मृत होऊ लागली.

त्या सेनेचे रक्षण करण्यासाठी मग तारकासुराने वायुअस्त्राचा प्रयोग केला. त्या भीषण वाऱ्याने पर्जन्यास्त्राचे ढग अस्ताव्यस्त करून टाकले आणि मग देवसेनेला उडवून लावण्याचा सपाटा आरंभिला.

शुष्क पालापाचोळा उडावा तशी देवसेना आसमंतात भिरकावली जाऊ लागली. तारकासुराने मग एक अतितीक्ष्ण खड्ग हाती घेतले आणि त्यांच्या आघाताने देवराजास मूर्च्छित केले. यमधर्मालाही गदेने मूर्च्छित करून देवराज इंद्राला बंधनानी जखडून तारकासुर आपल्या सेनेसह नगरीत परतला.

देवसैन्य अनाथ झाले. सैरावैरा वाट सापडेल तिकडे पळू लागले. दैत्येंद्रांना विजय मिळाला. ते तिकडे आनंदोत्सव साजरा करू लागले आणि इकडे देवसेनेचे उर्वरीत समस्त सैनिक भगवान श्रीभोलेनाथांना शरण गेले.

***